महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचाऱ्यांना सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतन संरचना मंजूर करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांक :- न्यायाप्र-१९२०/ प्र.क्र.१९६/ पापु-२३**

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई ४०० ००१
दिनांक :- १३ मे, २०२५

वाचा:

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: मजीप्रा-१११९/ प्र.क्र.६५/पापु-२३, दिनांक २३.०९.२०२१
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक: मजीप्रा-२०१४/प्र.क्र.३३(अ)/ पापु-२३, दिनांक २३.३.२०१७
३) शासन अधिसूचना, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर-२०१९/प्र.क्र.०१/सेवा-९, दि. ३०/०१/२०१९
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर-२०१९/प्र.क्र.८/सेवा-९, दि. २०/०२/२०१९
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर-२०१९/प्र.क्र.१५/सेवा-९, दि. १४/०५/२०१९
६) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: वेपुर-२०१९/प्र.क्र.८/सेवा-९, दि. ३०/०५/२०१९
७) संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांचे पत्र क्र. मजीप्रा/वित्त-२/निधी/२०२२-२३/१९३, दिनांक १०.१०.२०२२.
८) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ७ एप्रिल, २०२५.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचाऱ्यांना संदर्भाधीन (१) च्या शासन निर्णयान्वये दिनांक १ एप्रिल, २०१७ पासून सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनश्रेणी लागू करण्यात आली आहे. सुधारित वेतन संरचनेतील वेतननिश्चिती आणि त्यानुषंगाने दिनांक १.०४.२०१७ पासून पुढील अनुज्ञेय थकबाकीचे प्रदान संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन अधिसूचना, वित्त विभाग, दिनांक ३० जानेवारी, २०१९, संदर्भाधीन क्र. ४ शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक २० फेब्रुवारी, २०१९, संदर्भाधीन क्र. ५ येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक १४ मे, २०१९ आणि संदर्भाधीन क्र. ६ येथील शासन परिपत्रक, वित्त विभाग, दिनांक ३० मे, २०१९ मधील तरतूदींनुसार तसेच वित्त विभागाकडून वेळोवेळी दिलेल्या सूचनांप्रमाणे करण्याबाबत संदर्भाधीन शासन निर्णयान्वये सूचीत करण्यात आले आहे. तसेच एप्रिल, २०१७ पासून पुढील थकबाकीच्या अनुषंगाने सर्व कर्मचाऱ्यांचे सुधारित वेतन परिगणीत केल्यानंतर प्रत्यक्ष खर्चाप्रमाणे अनुज्ञेय थकबाकीच्या रकमेची मागणी प्राधिकरणाने शासनाकडे

स्वतंत्ररित्या करण्याच्या सूचना देखील देण्यात आल्या आहेत. त्यानुषंगाने दिनांक १.०४.२०१७ ते ३०.०९.२०२१ या कालावधीतील थकबाकीची परिगणना करुन एकूण थकबाकी रु १०२.५३ कोटी इतकी असल्याचे प्राधिकरणाने संदर्भाधीन (७) येथील पत्रान्वये कळविले आहे. त्यानुसार थकबाकीचा पहिला हप्ता म्हणून प्राधिकरणाला निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

शासन निर्णय :-

महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील कर्मचाऱ्यांना दिनांक १.०४.२०१७ पासून सातव्या वेतन आयागानुसार सुधारित वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली असून दिनांक १.१०.२०२१ पासून रोखीने अदा करण्यात येत आहे. दिनांक १.०४.२०१७ ते ३०.०९.२०२१ या कालावधीतील एकूण थकबाकीपैकी पहिल्या हप्त्यापोटी रु.२१,८१,६०,०००/- (अक्षरी रुपये एकवीस कोटी एक्क्याऐंशी लक्ष साठ हजार फक्त) इतका निधी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला मंजूर व वितरीत करण्यात येत आहे.

२. सातव्या वेतन आयोगाच्या थकबाकीचे हप्ते अदा करण्यासंदर्भात वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांप्रमाणे कार्यवाही करावी.

३. काही उपअभियंता/कार्यकारी अभियंता यांना जिल्हा परिषदांमध्ये कार्यरत असताना सातव्या वेतन आयोगाचे हप्ते अदा झाल्याची शक्यता विचारात घेऊन त्याप्रमाणे खात्री करुन अशा अधिकाऱ्यांना पुन्हा थकबाकीचा हप्ता अदा होणार नाही, याची दक्षता प्राधिकरणाने घ्यावी.

४. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी. या निधीचा अन्य बाबींवरील खर्च ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल व अशा कृतीसाठी संबंधित अधिकारी/कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र राहतील.

५. वित्त विभागाच्या दिनांक १२.०१.२०२३ च्या शासन निर्णयानुसार सदर अनुदान बिनशर्त आहे. तथापि झालेल्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाशी वेळोवेळी ताळमेळ घ्यावा. ताळमेळाचे काम प्रलंबित असल्यास पुढील निधी वितरीत करण्यात येणार नाही. शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये. वितरीत केलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तीचे पालन करण्याची जबाबदारी संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांची राहील.

६. या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून तर श्री. रा.म. गेंगजे, उप सचिव, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

७. याबाबत होणारा खर्च "मागणी क्रमांक -वाय २- २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१- पाणी पुरवठा, ००१-संचालन व प्रशासन, (०१) आस्थापना, (०१)(०२) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास वेतन व भत्त्यापोटी सहायक अनुदान, दत्तमत (२२१५A०४१), ३६- सहायक अनुदाने (वेतन)" या लेखाशीर्षांतर्गत खर्ची टाकून तो सन २०२५-२६ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

८.	वित्त विभाग, अनौपचारीक संदर्भ क्रमांक १९८/व्यय-३, दिनांक११.०४.२०२५ नुसार प्राप्त अभिप्रायांनुसार तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ७.०४.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या अधिकारात व बिम्स प्रणालीवर उपलब्ध निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

९.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या WWW.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५१३१७०८४६०९७०२८ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB B HAJARE

Digitally signed by BALASAHEB B HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB B HAJARE
Date: 2025.05.13 17:09:38 +05'30'

**( बाळासाहेब बा हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
२. संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
३. महालेखापाल-१ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र मुंबई
४. महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र मुंबई
५. महालेखापाल-२ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र नागपूर
६. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र नागपूर
७. संचालक लेखा व कोषागारे, मुंबई
८. अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई
९. मुख्य लेखापरीक्षक स्थानिक निधी हिशोब, मुंबई
१०. उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशोब, मुंबई/ पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती
११. निवासी लेखापरीक्षक, मुंबई
१२. सेवा-४, सेवा-९, साउ, व्यय-३, अर्थसंकल्प-१८ कार्यासने, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (कार्यासन पापु-२३)